**गोंदिया जिल्ह्यातील देवरी तालुक्यात चिचगड येथे अप्पर तहसिल कार्यालय स्थापन करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक प्राफेब-२०१५/ VIP ०५/प्र.क्र.२३/ म-१०**
मंत्रालय, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मुंबई- ४०००३२.
दिनांक: २१ फेब्रुवारी, २०१९

**वाचा:-** विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा/कार्या-७(३)/सीआर-७५/१७, दिनांक ०४.१२.२०१७

**प्रस्तावना:-**

गोंदिया जिल्ह्यातील देवरी तालुक्याची वाढणारी लोकसंख्या, मोठे क्षेत्रफळ, इ. बाबींमुळे सध्याच्या देवरी तालुक्यातील तहसील कार्यालयावर कामकाजाचा मोठा ताण पडत असल्यामुळे प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने गोंदिया जिल्ह्यातील देवरी तालुक्यातील चिचगड येथे स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

गोंदिया जिल्ह्यातील देवरी तालुक्यातील चिचगड येथे स्वतंत्र अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्यास व त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे पद मंजुरीस व अन्य अनुषंगिक बाबीस प्रस्तुत शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहेः-

१. विद्यमान गोंदिया जिल्ह्यातील देवरी तहसिल कार्यालय बळकट करण्याच्या दृष्टीने अप्पर तहसिलदार, चिचगड यांच्या नवीन कार्यालयासाठी खालील ७ पदे नियमित वेतनश्रेणीवर मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर पदे ही सध्याच्या त्या-त्या संवर्गाचा एक भाग राहतील.

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी (रु.) | मंजूर पदाची संख्या | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | अप्पर तहसिलदार | १५,६००-३९,१०० - ग्रेड पे ५,०००/- | १ | १ |
| २ | नायब तहसिलदार | ९,३००-३४,८०० - ग्रेड पे-४,३०० /- | १ | १ |
| ३ | अव्वल कारकून | ५,२००-२०,२०० - ग्रेड पे-३,५००/- | १ | १ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | ५,२००-२०,२०० - ग्रेड पे १,९००/- | ४ | ४ |
| | | एकूण | ७ | ७ |

२. तसेच सदर नवीन कार्यालयासाठी वाहनचालक-१, शिपाई-१ अशी काल्पनिक २ पदे बाह्ययंत्रणेद्वारे वर्ग करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

३. गोंदिया जिल्ह्यातील तहसिलदार कार्यालय, देवरी तसेच अप्पर तहसिलदार कार्यालय चिचगड यांचे कार्यक्षेत्रात खालीलप्रमाणे महसुली मंडळे व गावे राहतील.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | महसुली मंडळे | महसुली गावे |
|---|---|---|---|
| १ | तहसिलदार, देवरी | एकूण मंडळे - ०३<br>मुल्ला (२७ गावे), देवरी (२८ गावे) व सिंदीबीरी ( ३२ गावे) | ८७ |
| २ | अप्पर तहसिलदार, चिचगड | एकूण मंडळे - ०२<br>ककोडी (१७ गावे), चिचगड (३३ गावे) | ५० |

४. गोंदिया जिल्ह्यातील तहसिलदार, देवरी तसेच अप्पर तहसिलदार, चिचगड यांच्या कार्यक्षेत्रातील महसूल मंडळांतर्गत तलाठी साझे व त्यामध्ये अंतर्भूत होणाऱ्या गावांची यादी प्रसिद्ध करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, गोंदिया यांचे स्तरावर करण्यात यावी.

५. अप्पर तहसिलदार, चिचगड, ता. देवरी, जि. गोंदिया यांचे प्रतिवेदन अधिकारी म्हणून संबंधित उपविभागीय अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, गोंदिया हे काम पाहतील.

६. अप्पर तहसिलदार, चिचगड, ता. देवरी, जि. गोंदिया यांना सदर शासन निर्णयान्वये कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम १३ पोटकलम (३) नुसार तहसिलदार देवरी यांना प्रदान करण्यात आलेल्या शक्ती अप्पर तहसिलदार, चिचगड यांना त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रापुरत्या प्रदान करण्याबाबत स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

८. गोंदिया जिल्ह्यातील देवरी तालुक्यात अप्पर तहसिलदार कार्यालय स्थापन करण्याकरिता येणारा खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३ - जिल्हा प्रशासन, ०९४ इतर आस्थापना, ०९४ (०१) उप विभागीय आस्थापना ०९४ (०१) (०५), आयुक्त, नागपूर, ( २०५३ ०२०६)" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. मंजूर तरतूद अपुरी पडत असल्यास वाढीव तरतूदीची मागणी करावी व ते शक्य नसल्यास पूरक मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

९. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६३५/आपुक, दिनांक ०४.१२.२०१७ व नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे

इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२२११११२५२१६२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIRAJ VISHNU PHALLE

Digitally signed by RAVIRAJ VISHNU PHALLE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=d1a28181e23383c4e20fc8d5ff3d1c5505f086ea0b1eee531142b2aeec83a590, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bea42246bc0bcf44a3792edbf80cc8f17c935de2c6b145c96db4be6a8a381506, ou=REVENUE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVIRAJ VISHNU PHALLE
Date: 2019.02.22 12:22:47 +05'30'

( रविराज फल्ले )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६. अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०.प्रधान सचिव (रवका), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११.प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२.विभागीय आयुक्त, नागपूर
१३.जिल्हाधिकारी, गोंदिया
१४.उपविभागीय अधिकारी, देवरी, जि. गोंदिया
१५.तहसिलदार, देवरी, जि. गोंदिया
१६.अप्पर तहसिलदार, चिचगड, ता. देवरी, जि. गोंदिया
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया,
१८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१९.कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यासन ई-३/ ई-८/ ई-९/ ई-१०/ ब-१/ज-८)
२०.वित्त विभाग ( का. विसू-१/ अर्थसंकल्प -६/ व्यय-९/ आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई
२१.महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
२२.निवड नस्ती-कार्यासन म-१०